मुंबई करमणूक शुल्क (सुधारणा) अधिनियम २०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.३१) च्या अंमलबजावणी बाबतचे प्रशासकीय आदेश

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्र.ईएनटी १००६/प्र.क्र.२२२/टी-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २३ फेब्रुवारी , २०११

वाचा :- मुंबई करमणूक शुल्क (सुधारणा) अधिनियम २०१० ( सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.३१) , दिनांक २१ डिसेंबर, २०१०

**शासन निर्णय :-**

मुंबई करमणूक शुल्क अधिनियम १९२३ मधील कलम ३ (१) (ब) चे तिसरे परंतुकातील तरतूदीनुसार जलक्रिडा उपक्रमात (water sports activity ) प्रवेशाकरिता भरण्यात आलेल्या रकमेच्या १० टक्के रक्कम ही करमणूक शुल्क म्हणून वसूल करण्यांत येते. तसेच सदरहू अधिनियमातील कलम ३ अ अ नुसार जलक्रिडा उपक्रमाच्या प्रवेश मुल्यावर एक रुपयापर्यन्त ५ टक्के दराने व एक रुपयापेक्षा अधिक प्रवेशमुल्याच्या रकमेवर १० टक्के दराने अधिभार आकारण्यात येतो.

२. जलक्रिडा उपक्रमात प्रवेशासाठी देण्यात येणा-या रकमेवर करमणूक शुल्क व अधिभाराची आकारणी करण्यात येत असल्यामुळे दुहेरी कराधान होत असल्याने जलक्रिडा उपक्रमावर करमणूक शुल्क व अधिभार आकारणीमध्ये सुसूत्रता आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने मुंबई करमणूक शुल्क अधिनियम १९२३ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आल्या आहेत.

१) मुबई करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मधील कलम ३ अ अ अन्वये आकारण्यात येणा-या अधिभाराच्या आकारणीत सुसूत्रता आणण्याकरिता, जलक्रिडा उपक्रमांवर आकारण्यात येणारा अधिभार "प्रवेश मुल्या " ऐवजी "देय करमणूक शुल्कावर " आकारण्यात यावा.

२) महसूलातील तूट भरुन काढण्यासाठी उक्त अधिनियमातील कलम ३ (१) (ब) खाली तिसऱ्या परंतुकात सुधारणा करुन मनोरंजन उद्यानांप्रमाणे जलक्रिडा उपक्रमांवर १५ टक्के दराने करमणूक शुल्क आकारण्यात यावे.

या सुधारणांच्या अनुषंगाने मुंबई करमणूक शुल्क (सुधारणा) अधिनियम, २०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३१) दिनांक २१ डिसेंबर, २०१० च्या शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यांत आला आहे. सदर सुधारीत तरतूदीनुसार आवश्यक कार्यवाही करुन सुधारीत दराने करमणूक शुल्क आकारणी करण्याची दक्षता घेण्यांत यावी. व त्याबाबतचा अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा.

४. सदर निर्णय अधिसूचना प्रसिध्द झाल्याच्या दिनांक २१ डिसेंबर, २०१० पासून अंमलात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०११ ०२२४ १६२१ ४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(विद्या हम्पय्या)
**अवर सचिव**
**महसूल व वन विभाग**

**सोबत:-**दिनांक २१ डिसेंबर, २०१० च्या
अधिसूचनेच्या प्रती

प्रत तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी.

प्रत माहितीकरिता अग्रेषित :-

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
४. अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५. प्रधान सचिव (विधी विधान), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. निवडनस्ती, टी-१ कार्यासन, महसूल व वन विभाग.